**"मुंबई उपनगरातील पश्चिम द्रुतगती महामार्गावरील सा. क्र. ५१६/८०० मधील जनता कॉलनी, जोगेश्वरी येथील भुयारी मार्गाचे रूंदीकरण करणे (द्रुतगतीमार्ग-६)"** या कामाच्या सुधारित अंदाजपत्रकीय किंमतीस मंजूरी प्रदान करणेबाबत........

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - सुप्रमा -२०१५/प्र.क्र.८/रस्ते-५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ४ सप्टेंबर, २०१५

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय क्र. द्रुतगती मार्ग-४३१२/सीआर-(१४७२)/पी-३, दि.२७/११/२०१२ अन्वये मुंबई उपनगरातील पश्चिम द्रुतगती महामार्गावरील सा. क्र. ५१६/८०० मधील जनता कॉलनी,जोगेश्वरी येथील भुयारी मार्गाचे रूंदीकरण करणे (द्रुतगतीमार्ग-६) या कामाच्या रु. ७,५०,००,०००/- (रुपये सात कोटी, पन्नास लक्ष फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदरच्या अंदाजपत्रकात १) भूयारी मार्गाचे रूंदीकरण, २) डांबरीकरण, व ३) संकीर्ण बाबीचा समावेश आहे.

मुख्य अभियंता यांनी त्यांचे पत्र क्र. जा.क्र.मुअ(विप्र)/का-१/पु.द्रु.मा/सुप्रमा/३००/२०१५, दिनांक १२ फेब्रुवारी, २०१५ नुसार सदर कामासाठी लागणारा रु. १७,४१,१४,४३३/- इतक्या रकमेचा सुधारित अंदाज सादर केला आहे. सदरच्या अंदाजपत्रकात १) भूयारी मार्गाचे रूंदीकरण, २) डांबरीकरण, व ३) संकीर्ण बाबीचा समावेश आहे.

सदर कामाच्या रु. १७,४१,१४,४३३/- (रुपये सतरा कोटी, एक्केचाळीस लक्ष, चौदा हजार, चारशे तेहतीस फक्त) इतक्या सुधारित अंदाजपत्रकीय किंमतीस मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुंबई उपनगरातील पश्चिम द्रुतगती महामार्गावरील सा. क्र. ५१६/८०० मधील जनता कॉलनी,जोगेश्वरी येथील भुयारी मार्गाचे रूंदीकरण करणे (द्रुतगतीमार्ग-६) या कामाच्या रु. १७,४१,१४,४३३/- (रुपये सतरा कोटी, एक्केचाळीस लक्ष, चौदा हजार, चारशे तेहतीस फक्त) इतक्या सुधारित अंदाजपत्रकीय किंमतीस या शासन निर्णयान्वये मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर कामासाठी सन २०१५- २०१६ च्या पुरवणी अर्थसंकल्पात तरतुद करण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय व्यय अग्रक्रम समितीच्या दि.१२/०८/२००१५ रोजीच्या बैठकीत मान्यता मिळाल्यानुसार काढण्यात येत आहे.

४. विभागाने जी रू. ७.५० कोटीची मूळ निविदा काढली आहे, तीमध्ये सेवा रस्त्याच्या नूतनीकरण इत्यादी बाबीचा समावेश आहे किंवा कसे ही स्पष्टता करून निविदेमध्ये त्याचा समावेश नसल्यास वेगळ्याने निविदा काढावी.

५. यापुढे परत सु-सुधारित प्रशासकीय मान्यता दिली जाणार नाही. सबब, मंजूर सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या अधीन राहूनच काम करावे.

६. सदरचे काम येत्या १२ महिन्यात पूर्ण करावे या अटीवर प्रस्ताव मान्य केलेला आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०१५०९०४१४१८४४८६१८** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laleetagouri Giribuwa

Digitally signed by Laleetagouri Giribuwa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Assistant Engineer GR-I, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laleetagouri Giribuwa
Date: 2015.09.04 14:23:49 +05'30'

**(ललितागौरी गिरीबुवा)**
सहाय्यक अभियंता-श्रेणी १ तथा
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१) महालेखापाल-१,महाराष्ट्र राज्य ( लेखापरीक्षा) मुंबई
२) महालेखापाल-१,महाराष्ट्र राज्य ( लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
३) महालेखापाल-२,महाराष्ट्र राज्य ( लेखापरीक्षा) नागपूर.
४) महालेखापाल-२,महाराष्ट्र राज्य ( लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
५) वित्त विभाग, (व्यय-११)मंत्रालय, मुंबई-४०००३२
६) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, विशेष प्रकल्प, मुंबई (सोबत अंदाजपत्रकाची प्रत)
७) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चेंबूर
८) कार्यकारी अभियंता, मार्ग विकास विभाग क्र.४, अंधेरी, मुंबई
९) निवडनस्ती कार्यासन रस्ते-५ सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.